# महाराष्ट्र शासन

क्रमांक:-ससंनि- ०८१८/प्र.क्र.८३/१३स,
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३ मार्च, २०२०

**<u>संदर्भ</u>**- समक्रमांक दि. ७ सप्टेंबर,२०१९ व दिनांक १४ जानेवारी, २०२० रोजीचे आदेश.

## आदेश

ज्याअर्थी, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम ७३ कब चे पोटकलम ११ च्या परंतुकान्वये गृहनिर्माण सहकारी संस्थांना निवडणूका घेण्याबाबत, दिलेल्या अधिकारानुसार, सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका घेण्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी निवडणूक नियम बनवण्याची आवश्यकता होती. त्यानुसार सहकार आयुक्तांनी नियमाचे प्रारुप तयार करण्यासाठी नियम समिती गठीत केली. नियम समितीमार्फत शासनास नियमाचे प्रारुप सादर होणे, त्यास विधी व न्याय विभागाची मान्यता घेऊन हरकती व सूचना मागविण्यासाठी प्रारुप नियम प्रसिध्द करणे, तसेच आलेल्या हरकती सूचना विचारात घेऊन नियम अंतिम करणे, दरम्यानच्या कालावधीत महाराष्ट्र विधानसभा निवडणूक आचारसंहिता सुरु होणे. या कारणांमुळे गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका घेण्याबाबतचे नियम अंतिम होण्यासाठी काही अवधी लागणार असल्याने दि. ७ सप्टेंबर २०१९ रोजीच्या आदेशान्वये २५० किंवा त्यापेक्षा पेक्षा कमी सदस्यंख्या असलेल्या गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका दि.३१/१२/२०१९ पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या होत्या; आणि

ज्याअर्थी, दि. २४.१०.२०१९ रोजीच्या राजपत्रात प्रसिध्द केलेल्या प्रारुप नियमाच्या अनुषंगाने शासनास मोठ्या प्रमाणात हरकती व सूचना प्राप्त झाल्या आहेत. गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या निवडणूका घेण्यासाठी परिपूर्ण नियम तयार करण्यासाठी प्राप्त हरकती व सूचना विचारात घेवून अंतिम करणे आवश्यक होते. तथापि, विधानमंडळाचे नागपूर येथे दि.१६/१२/२०१९ ते दि.२१/१२/२०१९ या कालावधीत पार पडलेल्या अधिवेशनात अधिकारी व्यस्त असणे, नागपूर हिवाळी अधिवेशनात मा. मुख्यमंत्री महोदयांनी राज्यातील शेतकऱ्यांसाठी महात्मा जोतीराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना- २०१९ ही योजना जाहीर करणे, ही योजना ही अत्यंत महत्त्वाची असून योजनेचे काम विहित वेळेत पूर्ण करण्यासाठी कर्जमाफी योजनेच्या कामात सहकार विभागातील मोठ्या प्रमाणातील अधिकारी व्यस्त असणे, या कारणामुळे दि. १४ जानेवारी, २०२० रोजीच्या आदेशान्वये गृहनिर्माण सहकारी संस्थांच्या समितीच्या निवडणुका दि. २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या होत्या; आणि

ज्याअर्थी, दिनांक २४ फेब्रुवारी,२०२० पासून सुरू झालेले विधानमंडळाचे अर्थसंकल्पिय अधिवेशन, त्याचप्रमाणे, शेतकऱ्यांसाठी जाहीर केलेली महात्मा जोतीराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना- २०१९, योजना विहीत वेळेत पूर्ण करण्यासाठी मोठ्या प्रमाणात व्यस्त असणारे सहकार विभागातील अधिकारी वर्ग व कर्जदार शेतक-यांच्या कर्जमाफीच्या कामाचा आवाका, या कारणांमुळे प्रारुप नियमाच्या अनुषंगाने प्राप्त हरकती व सुचना विचारात घेवून, सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका घेण्यासाठीची कार्यपध्दती निश्चित करण्यासाठी आवश्यक नियम अंतिम करणे नजिकच्या दोन महिन्यात शक्य होणार नाही.

त्याअर्थी, वर नमुद केलेल्या कारणांमुळे २५० किंवा त्यापेक्षा कमी सदस्य संख्या असणाऱ्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणुका पारदर्शी होण्यासाठी निवडणुक नियमांची नितांत आवश्यकता असल्याने निवडणुकीस पात्र असणाऱ्या, ज्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणुका दिनांक १४ जानेवारी,२०२० रोजीच्या आदेशान्वये दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या होत्या त्या सहकारी गृहनिर्माण संस्थांच्या निवडणूका या आदेशान्वये दिनांक ३० एप्रिल, २०२० पर्यंत पुढे ढकलण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००३०३१४५९५६९२०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2020.03.03 15:02:11 +05'30'

**(अनिल ज.चौधरी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त निबंधक, सहकारी संस्था पुणे.
२. सचिव, राज्य सहकारी निवडणूक प्राधिकरण, पुणे.
३. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
४. जिल्हा उपनिबंधक/ उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
५. निवडनस्ती-१३स